# मानवसेवा

## इस्लामच्या दृष्टिकोनातून

लेखक

**सय्यद जलालुद्दीन उमरी**

अनुवाद

**हुसैनखान चाँदखान पठाण**

"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

# मानवसेवेचे महत्त्व

इस्लामने मानवसेवेला आणि मानवाशी सद्वर्तनाला खूप महत्त्व दिले आहे. त्याने जनसेवा ही ईशसेवा असल्याचा खुलासा केला आहे. ईशदासांची मदत करणे वास्तविक ईश्वराची (अल्लाहची) मदत करणे होय, असे प्रतिपादन इस्लामने केले आहे. मानवाची मदत ही अल्लाहची मदत आहे. जर आपल्यासमोर ईशदासाने मदतीची याचना केली आणि आपण त्याला रिक्तहस्ते पाठविले तर आपण प्रत्यक्ष अल्लाहलाच रिक्तहस्ते पाठविले असे होईल. एखादा रुग्ण आपल्या मदतीसाठी गरजू असेल आणि आपण त्यास मदत करण्यास नकार दिला तर आपण अल्लाहच्या मदतीस नकार दिला असे इस्लामचे तत्त्वज्ञान सांगते. अल्लाहला प्रसन्न करण्यासाठी त्याच्या दासाचे दु:ख निवारण करणे आवश्यक आहे. जेव्हा जमिनीवरील अल्लाहच्या दासाला दयाळू आणि प्रेमळ वागणूक दिली जाते, तेव्हाच आकाशातील अल्लाहची कृपा आणि दया अवतरित होते. हे वास्तव फारच परिणामकारकरित्या आणि चित्ताकर्षक पद्धतीने एका हदीसद्वारे वर्णन करण्यात आले आहे. ही हदीसे कुदसी असून ती खालीलप्रमाणे आहे. (हदीस व इतर पारिभाषिक शब्दांचा खुलासा परिशिष्टात केला आहे.)

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की कयामतच्या दिवशी अल्लाह माणसाला विचारील, "हे आदमपुत्रा! मी आजारी होऊन पडून होतो, तू माझी विचारपूस करण्यासाठी माझ्या भेटीस आला नाहीस."

घाबरून मनुष्य नम्रपणे विचारील, "हे जगत्पालक अल्लाह! तू कधी आजारी होतास? आणि विचारपूस करण्यासाठी मी तुझ्या भेटीस कसा येऊ शकलो असतो?"

अल्लाह म्हणेल, "काय तुला माहीत नव्हते, माझा अमुक एक दास आजारी होता? तरीसुध्दा तू त्याच्या आजारपणाची विचारपूस करण्यासाठी त्याच्या भेटीस गेला नाहीस. जर तू त्याच्याकडे गेला असतास, तर तुला तेथे मी भेटलो असतो."

अल्लाह पुन्हा म्हणेल, "हे आदमपुत्र, मी तुझ्याकडे भोजनाची याचना केली होती. परंतु तू मला जेवण दिले नाहीस."

मनुष्य नम्रतेने विचारील, "हे, अल्लाह! तू कधी भुकेलेला होतास? आणि तुला मी कसे जेवू घातले असते?"

अल्लाह म्हणेल, "माझ्या अमुक एका दासाने तुझ्याकडे भोजनाची इच्छा व्यक्त

केली होती, काय तुला आठवत नाही? परंतु तू त्याला जेवू घातले नाहीस. जर तू त्याची भूक भागविली असतीस तर तुला येथे (कयामतमध्ये) पुण्य मिळाले असते.''

त्याचप्रमाणे अल्लाह विचारील, ''हे आदमपुत्रा! मी तुझ्याकडे पाणी मागितले होते. परंतु तू मला पाणी दिले नाहीस.''

त्यावर मनुष्य नम्रतेने विचारील, ''हे दोन्ही जगाच्या पालनकर्त्या! तू कधी तहानेलेला होतास आणि तुला पाणी मी कसे पाजले असते?''

अल्लाह म्हणेल, ''माझ्या अमुक एका दासाने तुझ्याकडे पाणी मागितले होते. पण त्याची तहान शमविण्यास तू नकार दिला. जर त्याची तहान तू भागविली असतीस, तर तुला येथे त्याचे पुण्य मिळालेले दिसले असते.'' (हदीस : मुस्लिम)

## १) मानवसेवा उपासना आहे

ईश्वराची (अल्लाहची) जवळीक (सामीप्य) आणि त्याची प्रसन्नता प्राप्त करण्याच्या दोन पद्धती आहेत. एक आपल्या निष्ठा त्याच्या स्वाधीन कराव्यात, म्हणून त्याच्यासमोर हात जोडून उभे राहावे, डोके टेकून नतमस्तक व्हावे. ही निष्ठाकृती आपण नमाजाच्या सहाय्याने उत्तमरित्या व्यक्त करू शकतो. दुसरी पद्धत, अल्लाहच्या दासांची सेवा करावी आणि त्यांच्याशी शिष्टाचाराने वागावे. जकात देणे हा एक त्याचा महत्त्वपूर्ण मार्ग आहे. नमाज ही शारीरिक उपासना आहे. जकात देणे ही आर्थिक उपासना आहे. अल्लाहचे श्रेष्ठत्व, त्याच्याविषयी पूज्य भाव आणि आपल्या दास्यत्वाचे प्रकटन नमाजमध्ये व्यक्त होते. माणसाच्या मनात दुसऱ्याविषयी सहानुभूती असल्यामुळे आपण आपला पैसा दुसऱ्यासाठी खर्च करू शकतो. ही बाब जकात दिल्यामुळे निदर्शनास येते. पवित्र कुरआनमध्ये नमाज आणि जकात या दोन्हींचा विशेषत: एकत्र उल्लेख केला आहे. दोन्हींवर समान जोर दिला आहे आणि या दोन्ही बाबी अमलात आणण्यासाठी पुन्हा पुन्हा ताकीद केली आहे. तन (शारीरिक) आणि मनाने (मानसिक) केलेल्या भक्ती (नमाज) पेक्षा धनाच्या सहाय्याने (दान, जकात देणे) केलेली उपासनासुध्दा काही कमी नाही असा याचा अर्थ आहे. अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी जसा तो (दास) शारीरिक उपासना आवश्यक समजतो, त्याचप्रमाणे आर्थिक उपासनासुद्धा जरूरी समजतो. तो जो धर्म (इस्लाम) पाळतो, श्रध्देने आणि प्रेमाने नतमस्तक व्हावे इतकेच नसून आपण मिळविलेल्या पैशातून अल्लाहच्या दासांचा हक्क मान्य करावा आणि गरजू लोकांसाठी खर्च करावा अशी त्या धर्माची मागणी आहे.

''आणि त्यांना याशिवाय कोणताही आदेश दिला गेला नव्हता की अल्लाहची भक्ती करावी, आपल्या धर्माला शुद्ध त्याच्यासाठीच ठेवून, अगदी एकाग्र होऊन आणि नमाज कायम करावी आणि जकात द्यावी. हाच अगदी बरोबर आणि योग्य धर्म आहे.''

(दिव्य कुरआन, ९८ :५)

## २) आराधनेची कमतरता मानव सेवेने भरून काढणे

शारीरिक (तन आणि मनाने केलेल्या) उपासनेला, काही विशिष्ट परिस्थितीत दिव्य कुरआनने जनसेवा, सद्वर्तणूक किंवा गरिबांना आर्थिक मदत यांचा विकल्प दिला आहे.

नमाजप्रमाणे रोजा (उपवास) एक शारीरिक आराधना आहे. यामध्ये माणसाला अल्लाहसाठी अन्न आणि पाण्याविना राहावे लागते आणि उपवासाच्या (रोजाच्या) कालावधीत मनुष्य आपल्या इच्छा आणि भावना यांचे नियमन करण्याचा प्रयत्न करतो. संकटग्रस्त लोकांची मदत करण्यास पवित्र कुरआनने या पवित्र शारीरिक आराधनेच्या (रोजाच्या) समान ठरविले आहे. जणू काही दोन्ही सत्कर्मे एकाच योग्यतेची आणि अल्लाहच्या सामीप्यासाठी समान दर्जाची आहेत.

रोजाच्या बाबतीत एक प्राथमिक आदेश होता की रोजा करण्याची ज्या व्यक्तीची शक्ती असतानासुद्धा ती रोजा करत नसेल तर तिने एका गरीबास जेवू घालावे.

''कोणत्याही इमानधारकाचे हे काम नव्हे की त्याने दुसऱ्या इमानधारकाला ठार करावे जोपर्यंत त्याच्याकडून चूक घडत नाही. आणि जी व्यक्ती एखाद्या इमानधारकाला चुकून ठार करील तर त्याचे प्रायश्चित हे आहे की तिने एका इमानधारकाला गुलामीतून मुक्त करावे. आणि ठार झालेल्या व्यक्तीच्या वारसांना खुनाबद्दल भरपाई द्यावी. परंतु त्याला अपवाद तो की जो खुनाची किंमत माफ करील, परंतु जर ठार झालेला तो मुसलमान एखाद्या अशा जनसमुदायापैकी असेल ज्याच्याशी तुमचे शत्रुत्व आहे तर त्याचे प्रायश्चित्त एक इमानधारक गुलाम मुक्त करणे होय, आणि जर तो एखाद्या अशा मुस्लिमेतर जनसमुदायापैकी असेल ज्याच्याशी तुमचा करार आहे तर त्याच्या वारसांना खुनाबद्दल भरपाई द्यावी आणि एका इमानधारक गुलामाला मुक्त करावे लागेल. परंतु ज्याला गुलाम आढळले नाही त्याने लागोपाठ दोन महिन्याचे उपवास करावेत.''

(दिव्य कुरआन, ४ :९२)

''हे लोक आपल्या पत्नींशी 'जिहार' (पत्नीला आई मानणे) करतील आणि मग त्या आपल्या शब्दापासून परत फिरतील जे त्यांनी उच्चारले होते, तर यापूर्वी की उभयतांनी

एकमेकांस स्पर्श करावे, एक गुलाम मुक्त करावा लागेल. याद्वारे तुम्हाला उपदेश केला जात आहे, आणि जे काही तुम्ही करता अल्लाह त्याची खबर राखणारा आहे. आणि ज्या व्यक्तीला गुलाम उपलब्ध होत नसेल त्याने दोन महिने निरंतर उपवास करावेत.''

(दिव्य कुरआन, ५८ :३-४)

''पण ज्या शपथा तुम्ही जाणूनबुजून घेता, त्यांच्यासाठी तो जरूर तुम्हाला पकडील. (अशी शपथ मोडण्याचे) प्रायश्चित्त हे होय की दहा गरिबांना त्या सर्वसाधारण प्रकारचे जेवण तुम्ही द्यावे, जे तुम्ही आपल्या मुलाबाळांना देता, अथवा त्यांना वस्त्रे द्यावीत किंवा एका गुलामाला मुक्त करावे आणि ज्याची अशी ऐपत नसेल त्याने तीन दिवसाचे उपवास करावेत.''

(दिव्य कुरआन, ५ :८९)

नमाज आणि रोजाप्रमाणे हज फक्त शारीरिक आराधना नाही. कारण हजसाठी पैसाही खर्च करावा लागतो. तथापि यात आर्थिक उपासनेबरोबरचा शारीरिक आराधनासुद्धा असल्याचे स्पष्ट आहे. या संबंधात एक आदेश आहे ज्याला हजमध्ये पारमार्थिक लाभ हवा असेल त्याने कुर्बानी (बळी देणे) करावी आणि जर कुर्बानीसाठी पशु उपलब्ध होत नसेल तर त्याने दहा रोजे करावेत.

गुलाम मुक्त करणे, गरिबांना भोजन, कपडे देणे, कुर्बानी करून गरिबांना मदत करणे इत्यादींना रोजाला समान दर्जाचा विकल्प उपरोक्त आज्ञाद्वारे देण्यात आला आहे. शारीरिक आराधनेमध्ये ज्या उणिवा राहतील त्यांची भरपाई करण्यासाठी ईशदासाशी सद्‌वर्तन करावे आणि त्यांची मदत करावी.

हजयात्रेच्या वेळी पुरुषाने सोवळेसारखी न शिवलेली वस्त्रे सर्व शरीरावर (डोके व हात सोडून) परिधान करावी लागतात. या पेहरावास 'एहराम' म्हणतात. या एहरामच्या अवस्थेत केस कापण्यास मनाई असते. जर एखाद्या त्रासामुळे केस कापावे लागले तर रोजा करावा लागतो किंवा कुर्बानी करावी किंवा दान द्यावे लागते.

रमजान महिन्याचे रोजे करत असताना काही नियमबाह्य आणि वाह्यात आचरण घडले असल्यास त्याचे प्रायश्चित्त म्हणून माणशी दोन शेर किंवा सव्वा दोन किलो गहू किंवा आपण खात असलेल्या सव्वा दोन किलो गव्हाचे बाजार भावाप्रमाणे पैसे, रमजान ईदच्या नमाजापूर्वी गरिबांना द्यावे लागतात. याला सदक-ए-फित्र किंवा संक्षेपात 'फित्रा' म्हणतात.

इतकेच काय ज्या लोकांना आपल्या वृद्धत्वामुळे किंवा आजारपणामुळे रोजे करण्याची शक्ती नसते, त्या लोकांनी एका रोजाच्या बदल्यात एका दरिद्री माणसाला दोन वेळा जेवू घालावे असा आदेश आहे.

ईश्वर आणि मानवाचे संबंध दृढ करण्यात शारीरिक (तन आणि मनाने केलेल्या) उपासनेला असाधारण महत्त्व आहे. रूकू (दोन्ही हात दोन्ही गुडघ्यावर ठेवून ओणवे होणे), सजदा (दोन्ही पायांची बोटे काबागृहाच्या दिशेने वाकवून, दोन्ही गुडघे जमिनीवर टेकवून, दोन्ही हात, नाक व कपाळ जमिनीवर टेकवणे) आणि दुआ (प्रार्थना) केल्याशिवाय कोणाही व्यक्तीस ईश्वराचे सामीप्य प्राप्त होऊ शकत नाही. या शारीरिक उपासनेला विशिष्ट परिस्थितीत मानवसेवा आणि सदाचार यांचा पर्याय मान्य करून आर्थिक उपासनेला धर्मव्यवस्थेत कल्पनातीत उच्च दर्जा प्रदान केला आहे.

# मानवसेवेच्या भिन्न पद्धती

ईशदासांची सेवा आणि त्यांच्याशी सद्‌वर्तन करण्याची कोणतीही एकच ठराविक पद्धत नाही. त्यांच्या अनेक वेगवेगळ्या पद्धती असू शकतात.

१) तात्काळ मदत

काही वेळी माणसाला वेळेवर मदत करावी लागते. त्या वेळी मनुष्य तात्काळ मदतीसाठी गरजू असतो. या वेळी त्यामध्ये थोडासा जरी निष्काळजीपणा झाला तर गरजू व्यक्तीचे अमर्याद नुकसान होऊ शकते. एखाद्या रूग्णास वेळेवर औषध मिळाले नाही, एखादी व्यक्ती भुकेने तडफडत आहे, त्याची भूक तत्परतेने मिटविली गेली नाही तर त्याचे जीवन धोक्यात पडण्याची शक्यता असते. तातडीच्या किंवा हंगामी मदतीची गरज केवळ गरीबास किंवा भिकाऱ्यासच असते असे नाही. उलट अशी गरज संपन्न माणसालासुद्धा भासू शकते. याचा संबंध त्याच्या आर्थिक क्षमतेपेक्षा त्याच्या त्या वेळच्या परिस्थितीशी असतो. यात तो तात्पुरत्या स्वरुपात ग्रस्त असतो. रस्त्यात एखाद्याचे पाकीट मारले गेले आणि त्याला आपल्या घरी पोहोचणे अवघड झाले असेल तर आपण त्याला नक्की मदत करावी जेणेकरून तो आपल्या घरी सहज पोहचू शकेल. वास्तविक तो त्याच्या आर्थिक हलाखीमुळे आपल्या मदतीचा गरजू नसतो. कधीकधी अतिश्रीमंत माणसालासुद्धा हात पसरण्यास लाचार व्हावे लागते. त्या वेळी त्याची गरज पूर्ण केली जावी हे माणसाचे कर्तव्य आहे. हेच मूलतत्त्व एका हदीसमध्ये सांगितले गेले आहे.

इमाम हुसैन (रजि.) यांचे निवेदन आहे की अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "याचना करणारा जरी घोड्यावर स्वार असेल तरी त्याला तुमच्यावर अधिकार आहे."

(हदीसः अहमद, अबू दाऊद)

दुसरी एक हदीस आहे,

माननीय अनस (रजि.) यांचे निवेदन आहे की अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "उपाशीपोटी असलेल्याचे पोट भरणे सर्वोत्तम दान आहे."

(हदीस : बैहकी)

उम्मे बजीद (रजि.) यांनी एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर! कधीकधी माझ्या दरवाजावर एखादा भिकारी येतो. माझ्याजवळ त्याला देण्यासाठी काही नसते. त्या वेळी खूप लाज वाटते." पैगंबरांनी सांगितले, "भिकाऱ्यास रिक्तहस्ते परत पाठवू नका. काहीही नसेल तर जळालेला खूर तरी त्याला द्या."

(हदीस : अहमद, अबू दाऊद, तिर्मिजी)

## २) गरजांचे कायम निराकरण

जनसेवेची दुसरी एक पद्धत आहे. अडचणींनी घेरला गेलेल्यास असे सुगम मार्ग उपलब्ध करून द्यावेत की तो अडचणीतून कायमचा बाहेर पडावा. त्याच्या अडचणी सोडविण्याच्या तात्पुरत्या मार्गाऐवजी स्थाई निराकरणाचा मार्ग शोधावा. ज्या कारणामुळे तो आपल्या जीवनसंग्रामात मागे पडला आहे त्या कारणांचेच निराकरण करण्यात यावे. एखाद्या भुकेलेल्या व्यक्तीस दोन भाकऱ्या खाऊ घालणे किंवा एखाद्या उघड्या विवस्त्र माणसाला जुने पुराणे कपडे देऊन त्याचे शरीर झाकणे या बाबी सत्कर्म आहेत यात शंका नाही. परंतु त्याचे दारिद्र्य निर्मूलन करण्याचा उपाय करणे वास्तविक त्यांची उत्तम सेवा होईल. त्याला उपाशी किंवा विवस्त्र राहावे लागू नये अशी त्याच्यात योग्यता निर्माण करण्यात यावी. त्याला आपल्या गरजांच्या परिपूर्तीकरिता प्रत्येक वेळी दुसऱ्या कोणाकडे हात पसरावे लागू नयेत किंवा दुसऱ्या कोणाकडे तोंड वेंगाडावे लागू नये. अशाच काही पद्धती पुढील हदीसद्वारे सांगण्यात आल्या आहेत.

एखाद्याला काही दिवसाकरिता दुधाची जरूरी आहे. त्याला रोज दुधाचे दान देत बसण्याऐवजी, एका हदीसनुसार दान म्हणून काही दिवसांकरिता दुभती सांडणी किंवा शेळी दान म्हणून दिली जावी हे सर्वोत्तम दान आहे. त्यामुळे त्याला सकाळ संध्याकाळ दूध पिता येईल. दूध देणे बंद झाल्यावर सांडणी किंवा शेळी परत करण्यात यावी.

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

दुसऱ्या एका हदीसमध्ये आहे की ज्या व्यक्तीने काही दिवसांकरिता दुभती शेळी दिली किंवा काही रुपये कर्जाऊ दिले किंवा कुणाला रस्ता दाखविला तर त्याचे एका गुलामाला मुक्त करण्याइतके त्याला पुण्य लाभेल. (हदीस: तिर्मिजी)

जेव्हा एखाद्या गरजूची काही दिवसांची गरज भागविण्यास इतकी प्रतिष्ठा असेल तर यावरून अनुमान करता येईल की एखाद्याचे दारिद्र्य निर्मलून करून, समाधानाने जीवन जगण्यायोग्य त्यास बनविण्यात कोणत्या प्रमाणात पुण्य मिळण्यास कारणीभूत होईल आणि अल्लाहजवळ या पुण्याचे फळ किती मोठे असेल.

## ३) सार्वजनिक हिताची कार्ये

मानवसेवा आणि दीनदु:खी लोकांना आर्थिक सहाय्य देण्याची तिसरी पद्धत म्हणजे सार्वजनिक हिताची कार्ये करणे होय. शाळा आणि रुग्णालये चालविणे, रस्ते आणि पूल बांधणे. धर्मशाळा आणि अनाथालये चालविणे ही सार्वजनिक हिताच्या

कार्याची वेगवेगळी रूपे आहेत. या प्रकारच्या कार्यांमुळे एखाद्या व्यक्तीला लाभ होण्याऐवजी संपूर्ण समाजाला लाभ होतो. म्हणून त्याचे महत्त्व ही खूप अधिक आहे. एखाद्या व्यक्तीला चांगले शिक्षण देऊन समाजात त्याला मानाचे स्थान प्राप्त करून देणे. ही खास त्या व्यक्तीची सेवा आहे, तथापि एक उत्तम शाळा चालविल्यामुळे त्यातून असंख्य विद्यार्थी विद्या आणि कलेने सुसज्जित होऊन बाहेर पडतील तर त्यामुळे संपूर्ण समाजाची सेवा होईल. समाजातील एका व्यक्तीचे दुसऱ्या व्यक्तीवर हक्क असतात आणि प्रत्येक व्यक्तीवर समाजाचेसुध्दा हक्क असतात. म्हणजे प्रत्येक हक्काची परिपूर्ती करणे आवश्यक आहे. एकीकडे पत्नी, मुले, नातेवाईक, मित्र यांच्या हक्कांची पूर्ती करणे प्रत्येक व्यक्तीचे कर्तव्य असते तर दुसरीकडे प्रत्येक व्यक्ती समाजाचा एक घटक असल्यामुळे, सामाजिक कर्तव्ये पार पाडण्याची जबाबदारीही त्याच्यावर असते. कोणत्याही समाजातील एखादी व्यक्ती या दोन्ही हक्कांची जाणीव ठेवते ती व्यक्ती सर्वोत्तम असते. दोन्ही हक्कांची पूर्तता करण्यात अशी व्यक्ती कसूर करत नाही. प्रत्येक व्यक्तीचे आपल्या निकटच्या व्यक्तीवर अधिक प्रेम असते आणि तिला तो दुसऱ्यावर प्राधान्य देतो. ही भावना नैसर्गिक आहे आणि त्या व्यक्तीशी दयापूर्ण वागणे काही मर्यादेपर्यंत योग्यही असते. तथापि काही लोक समाजाचे नुकसान करून आपल्या आप्त व्यक्तीचा फायदा करू इच्छितात. या प्रकारचे लोक समाजाचे हितशत्रू असतात. जी व्यक्ती आपल्या निकटतम् व्यक्तीकरितासुद्धा समाजाचे नुकसान करत नाही ती व्यक्ती समाजाची हितेच्छू असते. अशी व्यक्ती समाजाचे नेहमी कल्याण इच्छिते. जेव्हा अशा व्यक्ती समाजात असतात, तेच समाजाला उच्च स्तरावर पोहोचविण्याचे प्रयत्न करतात, तेव्हाच समाज प्रगत होऊ शकतो.

इस्लाम, आपल्या निकटतम व्यक्तींच्या हक्कांची परिपूर्ती करण्याचे बजावून सांगत असतानाच, समाजाचाही फायदा करण्यास, समाजाचे कल्याण साधण्यास आणि समाजाची उन्नती करण्याचे प्रयत्न करण्यास प्रोत्साहन देतो. म्हणून इस्लामने सामुदायिक कल्याण कार्याकडे पुन्हा पुन्हा लक्ष वेधले आहे आणि अशा कार्यांना फार महत्त्व दिले आहे, याची खालील हदीसावरून अटकळ बांधता येईल.

(१) अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यानी सांगितले,

"मी एका व्यक्तीला स्वर्गामध्ये फिरत असताना पाहिले. (तिचे विशिष्ट आचरण होते की) रस्त्यातून जाता-येता लोकांना त्रास होत असलेल्या एका वृक्षास त्याने कापून टाकले होते." (हदीस : मुस्लिम)

तात्पर्य, त्याने लोकांच्या मार्गातील त्रास दूर केल्यामुळे त्याला स्वर्गाचा मार्ग सुगम झाला. आणि कोणत्याही आडकाठीशिवाय (स्वर्गाच्या) हिरवळीवर फिरणे त्याला शक्य झाले.

(२) अबू हुरैरा (रजि.) यांचीच आणखी एक हदीस आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"एका व्यक्तीने रस्त्याने जाताना रस्त्याच्या मधोमध झाडाची फांदी पडलेली पाहिली. कुणालाही त्रास होऊ नये असा विचार करून त्याने ती फांदी बाजूला केली. अल्लाहला त्याचे हे कार्य पसंद पडल्यामुळे. अल्लाहने त्या कार्याबद्दल त्याला स्वर्गामध्ये प्रवेश दिला." (हदीस : बुखारी, मुस्लिम)

उपरोक्त पहिल्या हदीसमध्ये, लोकांना त्रास देणाऱ्या एका झाडाला कापून टाकणाऱ्यास स्वर्ग प्रवेशास पात्र ठरविले होते. परंतु दुसऱ्या हदीसमध्ये फक्त एक फांदी रस्त्यातून बाजूला केल्यामुळे स्वर्गप्राप्तीच्या ईशआदेश झाला. तात्पर्य, लोकांच्या मार्गातील लघुत्तम त्रास दूर करून त्यांना फायदा पोहोचविणाऱ्यास ईश्वर स्वर्गासारख्या अविनाशी अशा चांगल्या बाबीचा हकदार ठरवितो.

(३) साद (रजि.) यांच्या मातेचे निधन झाले. आपल्या मातेसाठी दानधर्म करण्याची त्यांना इच्छा झाली. म्हणून त्यांनी कोणते दान सर्वोत्तम आहे याची विचारणा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे केली.

पैगंबरांनी सांगितले, "विहीर खणा."

म्हणून त्यांनी आपल्या मातेच्या नावे विहीर खणवून घेतली.

(हदीस : अबू दाऊद, नसई)

विहीर खणवून घेणे ही एक निरंतर लोकसेवा आहे. अशा आणखीही लोकसेवा असू शकतात. जी व्यक्ती ईश्वराच्या मार्गात खर्च करू इच्छिते, तिने आपली संपत्ती अशा मानवसेवेसाठी खर्च करावी असे ही हदीस सांगते. हे सर्वोत्तम दान आहे.

(४) अबू हुरैरा (रजि.) यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांना विनंती केली, "तुम्ही मला अशी बाब सांगा की मला त्यापासून फायदा होऊ शकेल."

पैगंबरांनी उत्तर दिले, "रस्त्यातील त्रासदायक गोष्टी दूर कराव्यात."

(हदीस : मुस्लिम)

ही परिपूर्ण आणि बोधप्रद हदीस आहे. त्रास देणाऱ्या लहान-मोठ्या वस्तू रस्त्यातून दूर करण्याचा प्रयत्न करण्यास प्रोत्साहन या हदीसद्वारे दिले आहे. रस्त्यातून

काटे, दगड, काचा आणि इतर त्रासदायक अडथळे हटविणेसुद्धा पूण्यकर्म आहे. त्यामुळे माणसाला मरणोत्तर जीवनात निश्चित फायदा होईल. परंतु समाजातून मोठमोठी आधिभौतिक आणि अनैतिक अडथळे दूर करणे हे अधिक महत्त्वाचे आहे. कारण त्याशिवाय समाजाची उन्नती होऊ शकत नाही. जो समाज गरीबी, रोगराई आणि अज्ञानात खितपत पडला आहे आणि ज्या समाजामध्ये धर्म, जात, जमात, वंश, वर्ग, वर्ण, पक्ष इ.बद्दल फाजील पक्षपात दूरभिमान, दूषित पूर्वग्रह पाळले जात आहेत, जो समाज सर्वश्रेष्ठ सिद्धान्तासाठी त्याग करू शकत नाही. त्या समाजाला कधी प्रतिष्ठा आणि सन्मान प्राप्त होऊ शकत नाही. समाजाला नैतिकदृष्ट्या उच्च पातळीवर नेणे आणि भौतिकदृष्ट्या दणकट बनविणे ही समाजासाठी मोठी सेवा आहे.

(५) अबू हुरैरा (रजि.) यांचे आणखी एक निवेदन आहे. ते सांगतात, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"मुस्लिमांच्या मृत्यूनंतरही ज्या आचरणाचे आणि सत्कर्माचे पुण्य त्याला मिळत राहते, त्यामध्ये याही बाबींचा अंतर्भाव आहे. जे ज्ञान त्यांनी प्राप्त केले आणि त्याचा जगात प्रसार केला, त्यांची सदाचारी अपत्ये (कारण त्यांना सदाचारी बनविण्यात त्याचेही प्रयत्न कारणीभूत असतात), पवित्र कुरआन हा ग्रंथ आपला वारसा म्हणून सोडला, (ज्यापासून लोक फायदा करून घेत आहेत.) मस्जिद जी त्याने बांधली, धर्मशाळा बांधली, कालवा खोदला आणि निरोगी असताना आपल्या आयुष्यात आपल्या धनातून दान दिले." (हदीस : बैहकी)

या हदीस शरियतने सार्वजनिक हिताच्या कार्याना जे महत्त्व दिले ते जाहीर करतात. शरियतनुसार अशा कार्यामुळे (दानधर्मामुळे) लोकांना नेहमी फायदा मिळत राहतो आणि दात्याला अशा दानामुळे त्याच्या जीवनानंतरही पुण्य आणि पुण्याचे फळ मिळत राहते.

## ४) मानवसेवेच्या संस्था

एका व्यक्तीची आर्थिक क्षमता सीमित असते. ती व्यक्ती मानवसेवा आणि लोककल्याणाची मोठमोठी कार्ये एकट्याने पार पाडू शकत नाही. म्हणून अनेक व्यक्तींनी एकत्र येऊन संघटितरित्या अशी कार्ये करण्याचा प्रयत्न करावा. अनेक लोकांच्या सामुदायिक शक्तींचा उपयोग करून घेणे हे अशा संघटनांचे वैशिष्ट्य असते. म्हणून त्यांचे सामर्थ्य खूप अधिक असते आणि कार्ये त्यांच्याकडून होणे शक्य असते. जे कार्य एखाद्या व्यक्तीच्या हातून होत नाही, ते संघटनेमार्फत होणे सहज शक्य असते. जी ध्येयसिद्धी एखाद्या व्यक्तीला कठीण वाटते, ती संघटनेमार्फत सहज प्राप्त होते.

मानवसेवेसाठी आणि लोककल्याणासाठी प्रयत्न कसोशीने सुव्यवस्थापित आणि संघटितरित्या केले गेल्यास त्याचे लाभही मोठ्या प्रमाणात मिळतील. ज्या कार्यांना एखाद्या व्यक्तीने महत्त्व देऊनसुद्धा ती व्यक्ती एकट्याने पार पाडू शकत नाही, ती कार्ये संघटित संस्थेमार्फत होऊ शकतात. इस्लाम मानवसेवेसाठी संघटित प्रयत्नाना पसंद करतो आणि त्यांना प्रोत्साहन देतो. या उद्देशाने इस्लाम, गैरमुस्लिमांच्या संघटनांशी परस्पर सहकार्यास तयार असतो. कारण हे इस्लामच्या अगदी उपदेशानुसार आहे आणि यामुळे त्याचाच एक महत्त्वाचा उद्देश पूर्ण होतो.

पैगंबर मुहम्मद (स.) यांना पैगंबरत्व प्राप्त होण्यापूर्वीच्या कालावधीत अरबस्तानात कोणतीही स्थायी राजकीय व्यवस्था नव्हती. त्यामुळे एक तऱ्हेची मामाजिक आणि राजकीय गोंधळांची (अराजकसदृश) परिस्थिती होती. लोकांचे जीवन व वित्त सुरक्षित नव्हते. 'बळी तो कान पिळी' या न्यायाने, सशक्त दुबळ्यावर अत्याचार करीत असत. तरी त्यांची विचारपूस करणारा कुणी नव्हता. क्षुल्लक क्षुल्लक बाबीवरून मारामाऱ्या, लढाया, खून, बलात्कार इ. नेहमीच होत असत. त्या असामाजिक दुष्कृत्यांना आडकाठी करणारा कुणी नव्हता. मक्का शहरासारख्या मध्यवर्ती शांती क्षेत्रातसुद्धा परिस्थिती चांगली नव्हती. काही दयाळू लोक ही परिस्थिती बदलावी म्हणून सल्ल्यासाठी अब्दुल्लाह बिन जदआन यांच्या घरी एकत्र आले. काहीही करून जुलूम, अत्याचार, अन्याय, हिंसा, बलात्कार रोखण्याचा निर्णय घेण्यात आला. कोणतीही व्यक्ती, मग ती मक्कावासी असो किंवा बाहेरची असो त्यावर अत्याचार होऊ दिले जाणार नाहीत. अत्याचारी व्यक्तीविरुद्ध अत्याचारित व्यक्तीची मदत केली जाईल आणि तिला तिचा हक्क मिळवून दिला जाईल. गरजू आणि गरिबांची मदत केली जाईल. पैगंबर मुहम्मद (स.) सुद्धा या प्रतिज्ञेत (करारात) सामील होते. हा करार त्यांना पैगंबरत्व प्राप्त होण्यापूर्वीचा होता. तथापि त्यांनी पैगंबरत्व प्राप्त झाल्यानंतरसुद्धा या कराराची स्तुती करताना सांगितले,

''लक़द शहद्तु फ़ी दारि अब्दुल्लाहि इब्न जद्आन हिल्फ़्फ़ म्मा उहिब्बु इन्न ली बिहीहुमरू नअ़म व लौ उद्अ़ा बिही नील्इस्लामि''

''मी अब्दुल्लाह बिन जदआनच्या घरी अशा एका करारात सामील होतो की मला त्या मोबदल्यात लाल रंगाचा उंट (अरबाची सर्वात मोठी संपत्ती) सुद्धा पसंद नाही. इस्लामच्या उदयानंतरसुद्धा मला त्यांचे निमंत्रण दिले गेले तरी ते मी स्वीकृत करीन.'' (इब्ने सअद १/१२९, इब्ने हिश्शाम १/१४४,१४५)

अत्याचार आणि अन्यायाची समाप्ती, मानवसेवा आणि लोककल्याण यासाठी जी संस्था कार्य करते, ती समाजाची खूप मोठी संपत्ती असते. जो समाज अशा संपत्तीपासून वंचित असतो, त्याचे दिवाळे निघते. इस्लाम अशा संपत्तीचा संरक्षकही आहे आणि अशा संस्थाना तो प्रगतीपथावर नेऊ इच्छितो.

५) राज्यसंस्थेचे सहकार्य

मानवसेवेसाठी सर्वांत मोठी संस्था राज्य असते. अनेक व्यक्ती आणि संघटनांचे सामर्थ्य हजार पट असले तरी त्यांचे सामर्थ्य मर्यादितच असते. समाजाच्या प्रत्येक घटकाची सेवा करता येऊ शकेल आणि सर्व अडचणींवर मात करता येऊ शकेल इतकी साधनसामुग्री संघटनांकडे उपलब्ध नसते. शासनाकडे असंख्य साधनांची मालकी असते आणि आपले इप्सित साध्य करण्यासाठी भिन्न पद्धतींचा वापर शासनसंस्था करू शकते. म्हणून शासनसंस्थेच्या लोककल्याणकारी जबाबदाऱ्या नैतिक आणि कायदेशीर समजल्या जातात. अशा शासनाने संपूर्ण राज्याची अशा तऱ्हेने सुधारणा करावी की राज्यात कोणतीही व्यक्ती जीवनावश्यक बाबीपासून वंचित राहू नये. प्रत्येकाच्या उन्नतीकरिता आवश्यक असणाऱ्या सर्व सुविधा, सवलती आणि संधी त्याला उपलब्ध व्हाव्यात. जर शासनास आपल्या जबाबदारीची जाणीव नसेल तर त्या शासनाचे अस्तित्व व्यर्थ आहे. तथापि जेव्हा प्रजेचे शासनाला सहकार्य मिळते तेव्हाच शासन इतकी मोठी जबाबदारी पार पाडू शकते. केवळ शासनाच्या प्रयत्नाने संपूर्ण समाज दारिद्र्य, अज्ञान, बेकारी आणि रोगराई इत्यादीपासून मुक्त होऊ शकत नाही. म्हणून समाजाला दुर्दशेतून बाहेर काढून त्याची प्रगती करण्याची भावना प्रत्येक व्यक्तीची असली पाहिजे. शासन आणि समाज यांच्या परस्पर सहकार्य आणि मदतीनेच मानवसेवा आणि लोककल्याणाचे कर्तव्य पार पाडणे शक्य आहे. याशिवाय हे कार्य नेहमीच अपूर्ण राहील.

# मानवसेवेचा व्यापक उद्देश

एखाद्याची सेवा करणे आणि त्याच्याशी सद्‌वर्तन करणे याचा अर्थ केवळ त्याला आर्थिक सहायता करणे आणि त्याच्या आर्थिक गरजा पूर्ण करणे असा नाही. उलट ज्यामध्ये प्रेम, सहानुभूती, सांत्वन, सर्वोत्तम नैतिकता यांचा समावेश असलेली वागणूक, जो एक सभ्य माणूस दुसऱ्या माणसाठी पसंद करतो, यांचाही अंतर्भाव मानवसेवेत होतो, याचे सद्‌वर्तणूक असे स्पष्टीकरण केले जाते. पोट भरण्यासाठी दोन वेळचे जेवण, शरीर झाकण्यासाठी वस्त्र आणि डोक्यावर छत केवळ इतक्याच गरजा माणसाला या जगात हव्या आहेत असे नाही. जर तो आजारी पडला तर त्याला रुग्णालयात पोहोचवावे लागेल. इतकेच नव्हे, जर तो दरिद्री असेल तर त्याला तुच्छ, क्षुद्र समजले जाऊ नये अशी त्याची अभिलाषा असते, त्याला बरोबरीची वागणूक दिली जावी. जर तो आजारी असेल तर केवळ त्याच्या औषधपाण्याची व्यवस्था करून न थांबता, त्याची सुश्रुषाही केली जावी, यात चांगुलपणा आहे. हे कबूल केले जावे. त्याच्याकडून एखादी चूक झाली तर क्षमा आणि दुर्लक्ष करण्यात यावे. त्याच्या आनंदात आणि दुःखात सहभागी व्हावे. ठोस आर्थिक मदत, भेटी, दिलासा यासह त्याच्याशी उत्तम नैतिक संबंध ठेवण्यात यावेत. याशिवाय पवित्र कुरआन आणि हदीसमध्ये सांगितलेली मानवसेवा आणि दीनदुःखी लोकांना आर्थिक सहाय्य करण्याची संकल्पना पूर्ण होत नाही. याचे एक उत्तम उदाहरण आहे. संततीने आपल्या खाण्यापिण्याची आणि कपड्यांची व्यवस्था करावी केवळ एवढ्यासाठीच आईवडील गरजवंत नसतात, तर ते प्रेमाचे आणि सहानुभूतीचे अधिक भुकेले असतात. त्यांच्या म्हातारपणातील दुःखे, आजार, त्रास, संकटे आपलेपणाने दूर करावीत. त्यांची जाणीवही त्यांना होऊ न देण्याचा प्रयत्न करावा. वृद्धत्वात दयापूर्ण वागणूक द्यावी. ते समाजात एकटे आणि निरुपयोगी आहेत असे त्यांना वाटू देऊ नये. अशा अपेक्षा म्हाताऱ्या आईवडीलांच्या असतात. या अपेक्षांची पूर्तता अन्न, पैसे आणि कपडे देऊन किंवा अन्य कशानेही होऊ शकत नाही. त्यांना आपले आदरणीय मानावे, त्यांच्याशी आदराने वागावे. म्हणून पवित्र कुरआनने संततीला केवळ आर्थिक जबाबदारीचा हुकूम दिलेला नसून त्यांच्याशी उत्तम वागण्याची सक्त ताकीद दिली आहे. यामध्ये उत्तम आर्थिक जबाबदारी सर्वप्रथम असते. आईवडिलांना कशी चांगली वागणूक द्यावी याबाबत पवित्र कुरआनने कसे लक्ष वेधले आहे ते पाहा.

''आईवडिलांशी सद्‌वर्तन करा, जर तुमच्यापाशी त्यांच्यापैकी कोणी एक अथवा दोघे वृद्ध होऊन राहिले तर त्यांच्यासाठी 'ब्र' शब्ददेखील काढू नका व त्यांना झिडकारून प्रत्युत्तरदेखील देऊ नका. तर त्यांच्याशी आदरपूर्वक बोला, आणि नरमी व दयार्द्रतेने त्यांच्यासमोर नमून राहा. आणि प्रार्थना करीत जा की, ''हे पालनकर्त्या, यांच्यावर दया

कर ज्याप्रमाणे यांनी दया व वात्सल्याने बालपणी माझे संगोपन केले.''

(दिव्य कुरआन, १७:२३-२४)

अशा तऱ्हेने मानवसेवेची सुरूवात इस्लामने आईवडिलांपासून म्हणजे घरापासून केली आहे. इस्लामने मानवसेवेचे बाळकडू पाजले आहे. आईवडिलांची सेवा न करणारी व्यक्ती समाजातील इतरांची सेवा करु शकेल काय?

इतर वेळी सहानुभूती, एक शब्द, एक प्रेमळ शब्द आणि खुशालीचे एखादे वाक्य, भौतिक किंवा आर्थिक सहाय्यापेक्षा कितीतरी अधिक किमती आणि मौल्यवान असते. मधुर वाणी आणि हसमुख वदनाने लोकांच्या सामोरे येण्यास पवित्र कुरआनने इतके महत्त्व दिले आहे की एकेठिकाणी नमाज आणि जकात याच्या आधी त्याचे वर्णन केले आहे.

''आणि लोकांशी चांगल्या पद्धतीने संभाषण करा, नमाज कायम करा आणि जकात द्या.'' (दिव्य कुरआन, २:८३)

पैशाच्या सहाय्याने एखाद्या दीनदुबळ्याची सेवा केली जाऊ शकते, मात्र ज्याच्याजवळ स्वत:चे भरपूर पैसे आहेत, त्याला आपल्या पैशाची मूळीच गरज नसते. परंतु सहानुभूती, प्रेम, माया, आपलेपणा आणि सद्वर्तणूक यांची प्रत्येक व्यक्ती भुकेलेली असते. याला कोणी गर्भश्रीमंत किंवा फाटका भिकारीसुद्धा अपवाद असू शकत नाही.

# मानवसेवेचे आणखी काही पैलू

हदीसमध्ये या पैलूंना उत्तमरित्या स्पष्ट करण्यात आले आहे की जनसेवा केवळ रूपया-पैशांनीच होते असे नाही. याउलट एखाद्या लाचाराची मदत करणे, एखाद्या आंधळ्यास रस्ता ओलाडण्यास मदत करणे, रस्त्यामधून त्रासदायक वस्तू (काचा, दगड, काटेरी फांद्या, केळ्याच्या साली इ.) दूर करणे, एखाद्याला पाणी भरून देणे, इतकेच नव्हे तर एखाद्याला हसतमुखाने भेटणे, एखाद्याशी चांगले वागणे यासुध्दा जनसेवा आहेत. प्रत्येक मुस्लिमाने दरदिवशी किमान ३६० दान (सदका) करावेत अशी धारणा आहे. इस्लामने उपरोल्लेखित जनसेवेच्या प्रकारांचा 'दान' (सदका) यामध्ये समावेश केला आहे. वरीलप्रमाणे जनसेवा करूनसुध्दा दानाचे पुण्य मिळविता येते. रूपया-पैशाच्या दानाप्रमाणे हेसुद्धा दान आहे.

अबू मूसा अशअरी (रजि.) यांचे निवेदन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''मुस्लिमांनी दान करणे अनिवार्य आहे.'' यावर पैगंबरांच्या सोबत्यांनी (सहाबी) प्रश्न केला, ''एखाद्याजवळ दान करण्यास काहीही नसेल, तर त्यांनी काय करावे?'' पैगंबरांनी सांगितले, ''श्रम करून स्वतःही काही मिळवावे आणि त्यातून काही दान करून दुसऱ्याचा फायदा करावा.'' सोबत्यांनी विचारले, ''श्रम करण्याची शक्ती नसेल तर काय करावे?'' पैगंबरांनी सांगितले, ''एखाद्या गरजवंत आणि संकटग्रस्ताची पैशाशिवाय अन्य प्रकारे मदत करावी.'' सोबत्यांनी विचारले, ''याचीही शक्ती नसेल तर काय करावे?'' पैगंबरांनी सांगितले, ''एखाद्याला चांगुलपणाचा आदेश द्यावा.'' पुन्हा प्रश्न विचारण्यात आला, ''हेही करता आले नाही तर त्याच्यासाठी काय उपदेश आहे?'' पैगंबरांनी सांगितले, ''त्याने स्वतः दुष्कृत्यांपासून परावृत्त व्हावे. हे सुध्दा त्याच्यासाठी दान आहे.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''सूर्योदय झाल्यापासून, माणसाच्या शरीरातील प्रत्येक सांध्यासाठी एक दान त्या माणसावर अनिवार्य होते. (माणसाच्या शरीरात अनेक सांधे आहेत, तथापि केवळ पैशाने दान होते असे नाही) दोन माणसांच्या भांडणात न्याय करणे हेही दान आहे. एखाद्याला जनावरावर (उंट किंवा घोडा इ.वर) बसण्यास मदत करणे हेही दान आहे. स्वारीवर एखाद्याचे सामान ठेवणे हेही दान आहे. एखाद्याशी मधुर वाणीने बोलणे हेही दान आहे. नमाजसाठी जात असताना प्रत्येक पावला गणिक एक दान होते. रस्त्यातून

त्रासदायक वस्तू दूर करणे हेही दान आहे.'' (हदीस : मुस्लिम)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी नरकाच्या भयानकतेचे वर्णन केले आणि म्हणाले,

''दान करून नरकापासून आपण आपला बचाव करून घ्या. जर आपल्याकडे काहीच नसेल तर खजुरीचा एक तुकडा द्यावा किंवा तेही नसेल तर मधुर वाणी बोलून, त्याद्वारे (नरकापासून) बचाव करून घ्या.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

आणखी एका हदीसमध्ये आहे. पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

''चांगुलपणाचे प्रत्येक काम दान आहे.''

वास्तविक मानवसेवा आणि मानवांचे हित साधणाऱ्या बाबींचे क्षेत्र इतके विस्तृत आहे की प्रत्येक व्यक्ती या क्षेत्रातील कर्तव्य पार पाडू शकते आणि खरोखर प्रत्येकाने पार पाडली पाहिजे. त्यासाठी श्रीमंत असण्याची आवश्यकता आहे असे नाही किंवा त्यासाठी शासनाच्या मदतीची जरूरी आहे असेही नाही. खरे पाहता धन, श्रीमंती किंवा शासन यांच्या सहाय्याने केवळ काही क्षेत्रातच मानवांची सेवा होऊ शकते. काही क्षेत्र असे आहेत तेथे केवळ चारित्र्यसंपन्न व्यक्ती कार्य करू शकतात. शासन एखाद्या लाचारास आर्थिक मदत देईल. एखाद्या बेकारास नोकरी देईल, एखाद्या गृहहीन व्यक्तीला घर देईल, एखाद्या रुग्णास औषधोपचाराची मदत करू शकेल. तथापि शासनाकडे सर्व साधने उपलब्ध असूनसुध्दा पिता, पुत्र, भाऊ, मित्र, सोबती, हितचिंतक प्रामाणिक नागरिक इ.चा पर्याय शासन बनू शकत नाही. यांच्याकडून जी भावनिक शांती, सांत्वन किंवा सद्वर्तणूक एखाद्या व्यक्तीला मिळते ती शासनाच्या लहान किंवा मोठ्या संस्थाकडून मिळू शकत नाही.

# इस्लाममध्ये मानवसेवेत कोणताही भेदभाव नाही

सद्वर्तणूक कोणत्याही विशिष्ट गटाशी किंवा जनसमूहाशी नसून सर्व मानवजातीशी असावी. आपल्या लोकांशी असावी आणि ती इतर लोकांशीही असावी. ती समविचारी आणि समान श्रध्दा बाळगणाऱ्यांशीही असावी आणि आपल्याबरोबर मतभिन्नता बाळगणारे आहेत, तेही सद्वर्तणूकीचे हक्कदार आहेत. जे आपली भाषा बोलतात आणि जे आपले विचार व्यक्त करण्यासाठी दुसरी भाषा बोलतात, हे सर्वजण सद्वर्तणुकीचे हक्कदार आहेत. थोडक्यात सद्वर्तणूक करताना आपले, परके, जात, धर्म, वर्ण, वंश, समविचारी, मतभिन्नता भाषाभिन्नता लिंगभेद असा कोणताही भेदभाव केला जाऊ नये, हीच पवित्र कुरआनची शिकवण आहे आणि हदीसनेही त्याचेच समर्थन केले आहे. उदाहरणार्थ, पवित्र कुरआनने दीनदुबळे, गरजू, लाचार, अनाथ आणि साधनसामुग्रीला वंचित असलेल्या माणसांची सेवा आणि सर्वांशी सद्वर्तणूक करण्याचा आदेश दिला आहे. कोणत्याही विशिष्ठ धर्माच्या, जातीच्या, जमातीच्या, वर्णाच्या, वंशाच्या लोकांची सेवा करावी आणि दुसऱ्यांची करू नये, असा उपदेश कोठेही केलेला नाही. म्हणून माणसांची लिंग, गट, जात, समूह, धर्म इ.मध्ये विभागणी करावी आणि त्यातील काहींना सेवा, सद्वर्तणूक आणि आर्थिक मदतीचे हक्कदार बनवावे आणि काहींना त्यापासून वंचित ठेवावे असे करणे पवित्र कुरआनची शिकवणूक आणि उद्देशाच्या विरुद्ध आहे. हे वास्तव हदीसमध्ये अगदी स्पष्ट करण्यात आले आहे. खाली काही हदीस स्पष्टीकरणार्थ दिल्या आहेत.

१) जरीर बिन अब्दुल्लाह (रजि.) यांचे निवेदन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, ''जो माणसावर दया करत नाही, अल्लाहसुध्दा त्याच्यावर दया करत नाही.''

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

२) अनस (रजि.) आणि अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) निवेदन करतात की पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, ''ईशनिर्मित मानव, प्राणी, वनस्पती इ. सर्व सृष्टी, ही त्याची संतती आहे. अल्लाहला ती व्यक्ती सर्वात प्रिय आहे, जी त्याच्या संततीशी सद्वर्तन करते.'' (हदीस : बैहकी)

३) अब्दुल्लाह इब्ने उमर (रजि.), पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या हदीसचे निवेदन करतात, ''माणसावर दया करणाऱ्यावर परमेश्वर (सुद्धा) दया करतो. (म्हणून) धरतीवाल्यावर दया करा आकाशवाला तुमच्यावर दया करील.''

(हदीस: अबू दाऊद, तिर्मिजी)

४) अबू हुरैरा (रजि.) याचे निवेदन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी

सांगितले, "दया आणि सहानुभूती त्याच व्यक्तीच्या मनातून काढली जाते, जी (व्यक्ती) दुर्दैवी आहे."
(हदीस : अहमद, तिर्मिजी)

५) अबू हुरैरा (रजि.) निवेदन करतात की काही लोक बसलेले होते. (तेव्हा) पैगंबर मुहम्मद (स.) त्यांच्याजवळ येऊन म्हणाले, "तुम्हापैकी कोण चांगला आणि कोण वाईट आहे ते सांगू?" पैगंबरांच्या या प्रश्नावर सर्वजण गप्प राहिले. परंतु पैगंबरांनी याच प्रश्नाचा जेव्हा तीन वेळा पुनरूच्चार केला, तेव्हा एक व्यक्ती म्हणाली, "हे, अल्लाहचे पैगंबर! सांगा आमच्यामध्ये कोण चांगला आहे आणि कोण वाईट आहे?" पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "तुमच्यामध्ये ती व्यक्ती सर्वोत्तम आहे, जिच्या चांगुलपणावर भरवसा केला जावा आणि जिच्या वाईटपणापासून लोक सुरक्षित आहेत आणि तुमच्यात सर्वांत वाईट ती व्यक्ती आहे जिच्या चांगुलपणावर विश्वास नाही आणि जिच्या वाईटपणापासून लोक सुरक्षित नाहीत."
(हदीसः तिर्मिजी, बैहकी)

या सर्व हदीसींमध्ये कोणत्याही भेदभावाशिवाय अल्लाहने निर्माण केलेल्या (मानव, प्राणी, वनस्पती, सर्व सृष्टी) सर्वांशी सद्वर्तणूक करण्याचा उपदेश दिला आहे. दरिद्री, विधवा, अनाथ, संकटग्रस्त, रुग्ण, दास, गुलाम, कैदी इ.च्या सेवेसाठी कोणतीही अट घातलेली नाही. हा या गोष्टीचा बळकट पुरावा आहे की ज्या व्यक्तीला आमच्या सहानुभूतीची आणि मदतीची गरज आहे त्या व्यक्तीला मदत केली पाहिजे. याबाबतीत आपला, परका, परिचित, अपरिचित, आपल्या धर्माचा, दुसऱ्या धर्माचा लिंग, वर्ण, वंश असा त्यांच्यामध्ये कोणताही फरक करणे आणि त्यातील एखाद्याला सेवेचा हक्कदार समजणे आणि दुसऱ्याला हक्कदार समजू नये, हे इस्लामचा स्वभाव आणि उपदेश यांच्या पूर्णपणे विरुद्ध आहे.

या सर्व हदीसींचा दुसरा एक पैलू आहे. या सर्व हदीसी मानवसेवेचे महत्त्व विशद करतात, जे कार्य रात्रंदिवसाच्या उपासनेशी समतुल्य आहे, ज्यामुळे मनुष्य अल्लाहचा प्रिय बनतो, ज्यामुळे अल्लाहचे सामीप्य लाभते, ज्यामुळे अल्लाहची दया-कृपा माणसावर अवतरित होते, ज्यामुळे निष्ठुरता आणि निर्दयीपणा हे माणसाच्या स्वभावातले दुराचार नाहीसे होण्याचे साधन बनते, जी (मानवसेवा) माणसाला प्रामाणिक आणि चारित्र्यवान बनवून समाजात त्याला पुरषोत्तमाचा दर्जा प्राप्त करून देते, त्या मानवसेवेच्या श्रेष्ठत्वास आणि महत्त्वास एक मुस्लिम कसा नाकारू शकतो. म्हणून त्याला त्यामध्ये (मानवसेवेमध्ये) इस्लामने इतके मोठे प्रोत्साहन दिले आहे की त्यानंतर त्याला दुसऱ्या कोणत्याही प्रोत्साहनाची गरज राहत नाही.

-----

# परिशिष्ट

'मानवसेवा इस्लामच्या दृष्टिकोनातून' या पुस्तिकेतील हदीस आणि तत्संबंधी काही पारिभाषिक शब्दांचा आणि संक्षिप्त रूपांचा खुलासा. हा खुलासा अनुवादकाने केला आहे.

१) सहाबी, सहाबा आणि सहाबीया

पैगंबर मुहम्मद (स.) यांना पैगंबरत्व प्राप्त झाल्यानंतर, ज्या पुरूषाने त्यांच्या जीवनात इस्लाम धर्म स्वीकारला आणि किमान एकदा तरी त्याने त्यांना प्रत्यक्ष पाहिले किंवा त्यांच्यासोबत बैठकीत (मजलिसमध्ये) तो बसला, त्या पुरुषास 'सहाबी' म्हणतात. 'सहाबा' हे सहाबीचे अनेकवचन आहे. उपरोल्लोखित अटी पूर्ण करणाऱ्या स्त्रीला 'सहाबीया' म्हणतात.

२) (स.), (स्व) आणि (स.अ.स.)

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या नावानंतर किंवा त्यांच्या सर्वनामाच्या उल्लेखानंतर किंवा त्यांना हुजूर संबोधून, त्या हुजूर शब्दानंतर कंसात 'स.' संक्षेपात लिहिले जाते. काहीजण कंसात 'स्व.' किवा 'स.अ.स.' किंवा 'सल्ल' असेही लिहितात. या सर्व संक्षिप्तांचे पूर्ण रूप खालिलप्रमाणे आहे.

''सल्लल्लाहु अलैहि व सल्लम''

''त्यांना अल्लाहकडून कृपा आणि शांती लाभावी''

वाचताना किंवा बोलताना पूर्ण रूप उच्चारावे लागते.

३) **(रजि.)** - सहाबी, सहाबा आणि सहाबीया यांच्या नावानंतर कंसात (रज़ि.) संक्षेपात लिहिले जाते. त्यांचे पूर्ण रूप खालीलप्रमाणे आहेत.

(अ) एका सहाबींच्या नावानंतर (रजि.) = 'रजियल्लाहु अन्हु'
'अल्लाह त्यांच्यावर प्रसन्न होवो'

(ब) एका सहाबीयांच्या नावानंतर (रजि.) = 'रजियल्लाहु अन्हा'
'अल्लाह त्या स्त्री सहाबीयावर प्रसन्न होवो'

(क) सहाबांच्या नावानंतर (रजि.) = 'रजियल्लाहु अन्हुम'
'अल्लाह त्या सर्व सहाबांवर प्रसन्न होवो'

(ड) अनेक साहबा आणि सहाबीयांच्या नावानंतर (रजि.) = 'रजियल्लाहु अन्हुमा'
'अल्लाह त्या सर्व सहाबा व सर्व सहाबीयांवर प्रसन्न होवो'

सर्वांच्या नावासमोर फक्त संक्षिप्त 'रजि.' लिहिलेले असले तरी, वाचताना किंवा बोलताना, संदर्भानुसार उपरोक्त योग्य ते पूर्णरूप वाचावे किंवा बोलावे लागते.

४) **ताबई** - ज्या मुस्लिम व्यक्तीने सहाबी (रजि.) किंवा सहाबीया (रजि.) यांना पाहिले, त्यांची भेट घेतली आणि त्यांच्याबरोबर बैठकीत (मजालिसमध्ये) बसली त्या व्यक्तीला 'ताबई' म्हणतात. 'ताबईन' हे 'ताबई'चे अनेकवचन आहे.

५) **तबअताबईन** - ज्या मुस्लिम व्यक्तीने 'ताबई'ला किंवा 'ताबईन'ना पाहिले, त्याला किंवा त्यांना भेटली आणि त्यांच्याबरोबर बैठकीत (मजलिसमध्ये) बसली, त्या व्यक्तीला 'तबअताबईन' म्हणतात. 'तबेताबईन' हा 'तबअताबईन'चा अपभ्रंश आहे.

६) **हदीस** - पैगंबरत्व लाभल्यानंतर, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी इस्लाम, इस्लामी तत्त्वज्ञान, इस्लामी परंपरा आणि पवित्र ग्रंथ कुरआनमधील आयतींचे, आज्ञांचे स्पष्टीकरण यासंबंधी आणि ते आचरणात आणण्यासंबंधी आपल्या सहाबा किंवा सहाबीया यांना उक्ती आणि कृतीद्वारे जे सांगितले त्यास 'हदीस' म्हणतात.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्वतःहून सहाबा, सहाबीया यांच्यासमोर केलेले कथन, उपदेश, प्रवचन यामध्ये जे सांगितले, ते सर्व 'हदीस'मध्ये समाविष्ट होते. तसेच सहाबा, सहाबीयांशी झालेल्या संभाषणात, चर्चेत, प्रश्नोत्तरात जे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले त्या सर्वांचा समावेश 'हदीस'मध्ये होतो. एखादी बाब पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासमोर आली आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यास मूक संमती दिली तर त्या बाबीचासुद्धा समावेश हदीसमध्ये होतो. हदीसचे अनेकवचन 'अहादीस' आहे.

## हदीसे कुदसी

काही हदीस पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे प्रत्यक्ष अल्लाहकडून अवतीर्ण झाल्या. त्यांना 'हदीसे कुदसी' म्हणतात. या 'हदीसे कुदसी'सुध्दा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडूनच सहाबा, सहाबीयांना सांगितल्या गेल्या. या 'हदीसे कुदसीं'चा समावेशही 'हदीस'मध्येच होतो.

## हदीसचे संकलन

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सहाबा आणि सहाबीयांपैकी काहींनी हदीस तोंडपाठ केल्या, तर काहींनी त्या लिहून घेतल्या. सहाबा, सहाबीयांकडून हदीस ताबईनना प्राप्त झाल्या. ताबईनकडून या हदीस तबेताबईनना प्राप्त झाल्या. यापैकी काहींनी हदीसींचे संकलनही केले. तथापि नंतर हदीसतज्ञांनी (मुहद्दीस) हदीसींचे संकलन शास्त्रशुध्द पद्धतीने केले. त्यांना हदीसींचे 'संकलनकार'सुद्धा म्हणतात. या संकलनकारांनी अस्नाद (हदीस निवेदन साखळी) चे तत्त्व काटेकोरपणे पाळले. हदीस सांगणारा तर पात्र आणि अधिकृत व्यक्ती असावयासच हवा. पण त्याच्यापासून क्रमाने ही साखळी तबेताबईन, ताबईन आणि सहाबी, सहाबा किंवा सहाबीया आणि शेवटी प्रत्यक्ष पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यापर्यंत पोहोचणे आवश्यक आहे. असे घडत असेल तर त्या हदीसला सही (अस्सल) हदीस समजली जाते. हदीसतज्ञांनी आपले सर्वस्व पणास लावून आणि अतिशय कष्ट घेऊन सही हदीसींचे संकलन केले आणि संकलनास ग्रंथरूप दिले. सर्वांत अधिक अधिकृत आणि मान्यताप्राप्त अशा सहा हदीससंकलित ग्रंथांना 'अस्-सहाऊस्-सित्ताह' असे म्हणतात. या सहा हदीसग्रंथांशिवाय आणखीही काही ग्रंथांत सही हदीसींचे संकलन करण्यात आले आहे. त्या ग्रंथाची आणि संकलनकारांची माहिती पुढे दिली आहे. हदीसींची बनावट संकलनेही आहेत. परंतु ती विचारात घेतली जात नाहीत.

## सही हदीस संकलित ग्रंथ

| ग्रंथाचे नाव | संकलनकाराचे नाव | संक्षिप्त नाव |
|---|---|---|
| सही बुखारी | अबू अब्दुल्लाह मुहम्मद इब्न इस्माईल बुखारी | बुखारी |
| सही मुस्लिम | अबुल हुसैन मुस्लिम इब्न अल हज्जाज अल कुरैशी | मुस्लिम |
| सुन्नान | अबू दाऊद सुलेमान इब्न इसा अस् सिजिस्तानी | दाऊद |
| जामे | अबू इसा मुहम्मद इब्न इसा अत् तिर्मिजी | तिर्मिजी |
| सुन्नान | अबू अब्दुल्लाह मुहम्मद इब्न यझीद इब्न माजा अलकाश्विनी | इब्न माजा |
| सुन्नान | अबू अब्दुर्रहमान अहमद इब्न शुऐब-अन-नसई | नसई |
| मुअत्ता | अबू अब्दुल्लाह मलिक इब्न अनस | अनस |
| ममनद | अहमद इब्न हंबल | हंबल |
| सुन्नान | अबू बक्र अहमद इब्न बैहकी | बैहकी |

उपरोक्त पहिल्या सहा ग्रंथांना 'अस् सहाऊस सित्ताह' म्हणतात. इतर काही सही हदीस संकलनकारांची संक्षिप्त नावे आहेत. १) हनीफा, २) दारिमी, ३) मिश्कात, ४) अस्फरानी, ५) सौरी, ६) जबीर, ७) दारकुत्नी, ८) खुझेमा, ९) नबवी

## हदीसचा हवाला देणे

हदीसचा लेखी किंवा तोंडी उल्लेख करताना प्रथम निवेदकाचे नाव लिहिले किंवा सांगितले जाते. हे निवेदक सहाबी किंवा सहाबीया असतात. म्हणून त्यांच्या नावानंतर (रजि.) लिहिले / सांगितले जाते. एका हदीसचे निवेदक एक किंवा अनेक असतात. नंतर पैगंबर मुहम्मद (स.) यांचे प्रत्यक्ष निवेदन / कथन लिहिले / सांगितले जाते. सर्वांत शेवटी संकलनकाराचे नाव/नावे हवाला म्हणून लिहिली किंवा सांगितली जातात.

## हदीसचे महत्त्व

मानवाच्या या जगातील जीवनासंबंधी आणि मरणोत्तर जीवनासंबंधीच्या सर्व आज्ञांची पवित्र कुरआन व हदीस ही दोन उगमस्थाने आहेत. पवित्र कुरआनचे स्पष्टीकरण हदीसमध्ये आहे असे एका जगप्रसिद्ध विद्वानाने सांगितले आहे. हदीसमुळे पवित्र कुरआनचे आकलन होणे आणि त्यातील आज्ञा अमलात आणणे सुलभ होते. अल्लाहच्या आज्ञा (कुरआनमधील आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आज्ञा हदीसमधील) सर्व मुस्लिमांना बंधनकारक आहेत. कुरआनमध्येच अनेक ठिकाणी अल्लाहचे आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांचे आज्ञापालन करा असे सांगितले आहे. उदाहरणार्थ :

"हे इमानधारकांनो! आज्ञापालन करा अल्लाहचे, आज्ञापालन करा पैगंबरांचे, आणि त्या लोकांचे जे तुमच्यापैकी आज्ञाधिकारी असतील." (दिव्य कुरआन, ४:५९)